


# हुशार उंदीर


मूळ लेखक : ईव्ह टायटस

चित्र : पॉल गाल्डन

मराठी अनुवाद : तृप्ती कर्णिक

# हुशार उंदीर

मूळ लेखक : ईव्ह टायटस
चित्र : पॉल गाल्डन
मराठी अनुवाद : तृप्ती कर्णिक





संपूर्ण फ्रान्समध्ये अनातोल हा सर्वात आनंदी आणि समाधानी उंदीर होता.




तो एका छोट्याशा उंदरांच्या गावात राहायचा.



ते गाव पॅरिस पासून अगदी जवळ होतं.




त्याच्याबरोबर त्याची लाडकी पत्नी – दोउचेत आणि

त्यांची सहा गोंडस मुलं राहत होती.





रोज सूर्य मावळला की घरातील पुरुषमंडळी आपल्या कुटुंबासाठी अन्न शोधायला पॅरिसच्या मुख्य रस्त्यावरून सायकलवर निघायचे.

पॅरिसला पोचल्यावर हे उंदीर गुप्त मार्गाने लोकांच्या घरामध्ये घुसत. हा गुप्त मार्ग फक्त त्यांनाच ठाऊक होता. अनातोलचा साथीदर गास्तोन नेहमी त्याच्यासोबत असायचा.

एका रात्री ते कुणाच्या तरी स्वयंपाकघरात अन्न शोधत होते तेव्हा अनातोलने बाजूच्या खोलीमध्ये लोकांच्या गप्पा ऐकल्या. ते उंदीरांविषयी बोलत होते. अनातोल उत्सुकतेने सोफ्याच्या खाली लपला आणि त्याचं बोलणं ऐकू लागला.



“बापरे! कसले भयंकर उंदीर आहेत हे!” एक बाई तक्रारीच्या सुरात म्हणाली.

“ते माझ्या स्वयंपाकघरात घुसतात. कचरापेटीतलं खाणं चिवडतात. टेबलवर चढून जे काही मिळेल ते पळवून नेतात. कधीकधी ते ताज्या अन्नाला तोंड लावतात. मला ते सगळं अन्न फेकून द्यावं लागतं. कोण जाणे, किती ठिकाणची घाण त्यांच्या पायांना लागलेली असते.”

“हे उंदीर म्हणजे पूर्ण फ्रान्ससाठी शरमेची गोष्ट आहे.” एक माणूस रागारागाने म्हणाला.

“उंदीराची जात म्हणजे सैतान आहे सैतान!”

हे सगळं ऐकून अनातोलला जबर धक्का बसला. तो पळतच स्वयंपाकघरात आला.

“गास्तोन, आपल्याला इथून ताबडतोब निघायला हवं.”

“अरे, ही अगदी शुल्लक गोष्ट आहे,” गास्तोन हसून म्हणाला.

“माणसं माणसं असतात आणि उंदीर उंदीर! आपल्या प्रेमाच्या लोकांना अन्न तर मिळायला हवं की नको. आणि त्यासाठी आपल्याला ह्याच लोकांच्या घरात घुसायला लागणार आहे.”

“पण मला स्वप्नातही वाटलं नव्हतं की हे लोक आपला इतका तिरस्कार करीत असतील.” दुखावलेला अनातोल रडू लागला.

“आपण इतके नकोसे आणि त्रासदायक आहोत हे ऐकून मला खूप अस्वथ वाटतं आहे. कुठे आहे माझा आत्मसन्मान? अभिमान आणि इज्जत?”

गास्तोनला काहीच फरक पडला नाही. तो खांदे उडवत म्हणाला, “शांत हो अनातोल आणि आवर स्वत:ला.”



घरी आल्यावर दोउचेतने अनातोलला शांत केले.

“तू बरोबर आहेस अनातोल,” दोउचेतने दु:खी आवाजात म्हटले. “जर लोकांना आपण बदल्यात काही चांगले देऊ शकलो तर...पण कसं शक्य आहे हे!”

हे ऐकून अनातोलने उडी मारली आणि दोउचेतबरोबर नाचू लागला.

“अशक्य? कदाचित मला जमू शकेल! तू मला अतिशय चांगली कल्पना सुचवली आहेस.”

त्यानंतर अनातोल टाइपरायटरपाशी बसला आणि त्याने तीस ते चाळीस संदेश टाइप केले.

जबरदस्त

खूप छान

छान

खास नाही

वाईट



मग त्याने प्रत्येक चिठ्ठीला टाचणी लावली आणि त्या सर्व चिठ्ठ्या काळजीपूर्वक आपल्या ब्रीफकेसमध्ये ठेवल्या.

त्या संध्याकाळी सायकलवरून पॅरिसला जाताना अनातोल म्हणाला, "गास्तोन, मी जर एकटाच बाहेर गेलो तर तुला अपमानित नाही ना वाटणार? कारण माझ्याकडे एक अशी कल्पना आहे ज्यावर मलाच एकट्याला गुप्तपणे काम करायला हवे."




गास्तोन उत्तरला, "मी तुझा खरा मित्र आहे की नाही! मग ख-या मित्राचा कधी अपमान होत नसतो. माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे. तुला खूप खूप शुभेच्छा!"




पॅरिसला पोचल्यावर अनातोलने आपल्या गटाचा निरोप घेतला आणि तो शहरातील बिझनेस पार्कच्या दिशेने चालू लागला. त्याने डुवाल चीज फॅक्टरीच्या समोर आपली सायकल लावली.

अनातोलने शरीर आकसले आणि दाराच्या खालून ब्रीफकेससकट तो आत शिरला. आहा! काय सुंगध दरवळत होता! त्याने आपल्या तीक्ष्ण घ्राणेद्रियाने अनेक प्रकारच्या चविष्ट चीजच्या प्रकारांना हुंगले - कैमेम्बर्ट, पोर्ट सलूट, ब्लू, सेंट मर्सलिन, रोकफोर्ट, ब्री इ.

मी पूर्ण रात्र तर असा हुंगत राहू शकत नाही, अनातोलने विचार केला. अजून तर बरेच काम बाकी आहे. घाईघाईने त्याने मजला पालथा घातला आणि एकदाची शोधत असलेली "चीज टेस्टिंग-रूम" त्याला सापडली.

तिथे मंद प्रकाश होता आणि लांबच्या लांब टेबल रांगेत लावली होती. टेबलांवर वेगवेगळ्या आकाराचे आणि प्रकारचे चीज मांडून ठेवले होते.



बिलकुल वेळ न दवडू देता अनातोल जवळच्या टेबलावर चढला.

सर्वप्रथम त्याने कैमेम्बर्ट चीज चाखले. “लाजवाब! अतिशय चविष्ट चीज!”

मग त्याने आपली ब्रीफकेस उघडली आणि त्यातून “जबरदस्त चव” ही चिठ्ठी काढली आणि ती त्या चीजमध्ये टोचली.

पुढचे चीज त्याला थोडे कडक लागले. त्याने त्यावर “खास चव नाही” अशी चिठ्ठी टोचली आणि चीजमध्ये हव्या असणाऱ्या सुधारणा पेन्सिलीने नोंदवल्या.

त्यानंतर अनातोलने न कंटाळता मोठ्या रांगेत रचून ठेवलेले प्रत्येक प्रकारचे चीज हुंगले, चाखले आणि गुणवत्तेप्रमाणे चिठ्ठी लावून ठेवली.






एकदाचे त्याचे काम संपले.

"चला ढुवाल चीज फॅक्टरी एक-दोन नवीन गोष्टी तरी शिकेल. संपूर्ण जगात उंदरांना "सर्वोत्तम चीज टेस्टर" म्हणून ओळखले जाते. आणि निदान माझ्यापुरता तरी मी काही चीज घरी आनंदाने घेऊन जाऊ शकतो कारण ते मी मेहनतीने कमावलं आहे. "

दुसऱ्या दिवशी दुवाल चीज फॅक्टरीमध्ये प्रचंड उत्सुकता पसरली. प्रत्येक चीजला अशा छोट्या-छोट्या चिठ्ठ्या लावल्या तरी कुणी?

तेवढ्यात फॅक्टरीचे मालक मिस्टर हेनरी दुवाल तिकडे आले.



"आपल्याला लवकरच समजेल की ह्या अनातोलला चीजमधलं नक्की किती कळतं!" त्यानंतर मिस्टर दुवालनी थोडं रॉकफोर्ट चीज चाखलं.

"अगदी बरोबर! अनातोलने योग्य सांगितलं आहे. ह्या चीजमध्ये खरंच अजून थोडी संत्र्याची सालं टाकायला हवीत."

"सगळ्यांनी इकडे लक्ष द्या. तसाही आपला व्यवसाय गेले कित्येक दिवस फारसा चांगला चालत नाही आहे. तेव्हा आपण अनातोलच्या सूचना ग्राह्य धरून चीज बनवूया आणि पुढे काय होते ते बघूया."

रोज रात्री अनातोल अजून काही चिठ्ठ्या सोडून जाऊ लागला. आणि रोज त्यानुसार चीज फॅक्टरीमधील कामगार थोडे बदल करू लागले.



लवकरच त्यांचा व्यवसाय एकदम तेजीत आला.

पूर्ण फ्रान्समधील जनता फक्त डुवाल चीजची मागणी करू लागले. मागणी इतकी प्रचंड वाढली की मिस्टर डुवालनी फॅक्टरी मोठ्या जागेत हलवली आणि सगळ्या कामगारांना पगार वाढवून दिले.

चिठ्ठ्या कोण लावून जातं हे मात्र त्यांना अजून शोधता आलं नव्हतं.

"अनातोल आपलं काम असं लपूनछपून का बरं करतो आहे?" मिस्टर डुवालनी आपल्या सेक्रेटरीला विचारलं.

"अनातोलचा खरंतर मोठा सत्कार करायला हवा. आपला व्यवसाय निव्वळ त्याच्यामुळेच भरभराटीला आला आहे."

मिस्टर डुवालनी अनातोलला एक पत्र लिहिलं आणि भेटण्याची विनंती केली. परंतु अनातोलने आपल्याला अज्ञातच राहायचं आहे असं उत्तरात लिहिलं.



मिस्टर डुवालनी अनातोल नावाच्या सर्व कामगारांना आपल्या केबिनमध्ये बोलावलं आणि विचारणा केली. पण सगळ्यांनीच आपण ह्या चिठ्या लावल्या नाही असं सांगितलं.

मिस्टर डुवालनी शोध घ्यायचा खूप प्रयत्न केला पण अनातोलचं रहस्य कायम एक रहस्यच राहिलं.

मग एके दिवशी मिस्टर डुवालनी आपल्या सेक्रेटरीला बोलावलं आणि ते सांगतील तसं एक मोठं पत्र टाइप करायला सांगितलं.



त्या रात्री अनातोलला एक चिट्ठी मिळाली.



DUVAL
LE MEILLEUR FROMAGE DU MONDE

प्रिय अनातोल,

ह्या पत्राद्वारे मी तुझे लाख लाख आभार मानू इच्छितो. निव्वळ तुझ्या मदतीमुळेच आमच्या व्यवसायाचे यश आणि विस्तार शक्य झाले आहे.

तुला व्यक्तिगत भेटण्याची माझी खूप इच्छा आहे. पण तू “अज्ञात” राहण्याचा निर्णय घेतला आहेस आणि त्याचा मी आदर करतो.

तू जो कुणी आहेस, हे मात्र स्पष्ट आहे की तू चीजचा प्रचंड चाहता आहेस. तुला आवडेल ते आणि हवे तेव्हा हवे तेवढे चीज तू घेऊन जाऊ शकतोस. रोज रात्री तुझ्यासाठी फ्रेंच ब्रेड, चॉकलेट आणि उत्तम दर्जाचे चीज ठेवत जाऊ. जर अजून काही चांगले बक्षिस तुझ्यासाठी ठेवता आले असते तर मला अधिक आनंद झाला असता.

अनातोल – आम्ही तुला अभिवादन करतो आहोत. आजपासून आम्ही तुझा उल्लेख “व्हाईस-प्रेसिडेंट चीज टेस्टिंग” ह्या नावाने करू.

आणि नेहमी लक्षात ठेव की तुझे इथे सदैव स्वागत आहे!

खूप खूप शुभेच्छा आणि प्रेम,!

तुझा मित्र,
हेनरी दुवाल

Henri Duval



दोउचेतने हे पत्र वाचलं तेव्हा ती आनंदाने म्हणाली, "कुठल्यातरी अनोळखी घरात जाऊन अन्न शोधत फिरण्याची आता काहीच गरज उरली नाही. जगातील सर्वात हुशार उंदीर आहेस तू!"



पॉल आणि पॉलेट,
क्लौद आणि क्लौदेत,
जॉर्ज आणि जॉर्जेट, अनातोलच्या खुर्चीवर चढले आणि त्यांनी अनातोलला घट्ट मिठी मारली.
"आम्हाला तुमचा खूप अभिमान आहे! आता आमचे बाबा एक सन्माननीय व्यवसायिक उंदीर आहेत!"

दुसऱ्या दिवशी अनातोलने गास्तोनला मदतनीस म्हणून येण्याचं आमंत्रण दिलं.

गास्तोनने त्याला एक जोरदार सलाम ठोकला आणि म्हणाला, “तुझ्यासोबत काम करायला मिळणं ही माझ्यासाठी भाग्याची गोष्ट आहे.”



त्यानंतर गास्तोनने आपल्या दोस्ताला प्रेमाने आलिंगन दिलं आणि आनंदाने रडत म्हणाला, “शाब्बास अनातोल! फारसं काही न करता आयुष्य काढायचं अशा समजुतीमध्ये आम्ही गुरफटलेले होतो. पण तू मात्र त्यात कधीच समाधान मानलं नाहीस. तू अतिशय हुशार आणि कर्तृत्ववान आहेस! अगदी कमालीचा उंदीर आहेस तू!

अनातोल आणि त्याचा जोडीदार दोघेही आनंदाने एकत्र काम करू लागले.

अनातोलचं रहस्य मात्र कायम गूढच राहिलं.

म्हणूनच जर तुम्ही कधी एखाद्या उंदराला उरलंसुरलं अन्न खाताना पाहिलं तर तुमच्या लगेच लक्षात येईल का हा उंदीर अनातोल नाही कारण अनातोल फ्रान्समधला सर्वात आनंदी आणि समाधानी उंदीर आहे.



